निरीक्षण गृहे / बालगृहातील मुला / मुलींच्या पुनर्वसनाकरीता समितीची स्थापना करणेबाबत

2004071916085600I-2500

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र. निरीगृ-२०००/प्र.क्र.३४६/का.३
नविन प्रशासकीय भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक :- १९ जुन, २०००

**वाचा** :- आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मवबाहवआ/उन्याया-१०९३/३६/२००१/का/२०९, दिनांक ९.५.२००१

**शासन निर्णय** :- बाल न्याय अधिनियम १९८६ अंतर्गत कार्यरत असलेल्या संस्थांमध्ये अनाथ, अवखळ, दुर्लक्षित, वाममार्गी, वाट चुकलेली मुले बाल कल्याण मंडळामार्फत दाखल होतात. सदर संस्थेमध्ये मुलांना १८ वर्षापर्यंत ठेवण्यात येते व मुलींना २१ वर्षापर्यंत ठेवण्यात येते. ही विहित केलेली मुदत पूर्ण झाल्यानंतर बालकांना पुढील योग्य त्या पुर्नवसनासाठी नोकरी तसेच उद्योगधंद्यांच्या सुविधांची माहिती करुन देण्याच्या तसेच मार्गदर्शन करण्याच्या दृष्टीने जिल्हास्तरीय पुनर्वसन समितीची स्थापना करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर समितीत खालील सदस्यांचा समावेश राहिल. :-

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| २) | महाराष्ट्र औद्योगिक विकास मंडळाचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ३) | जिल्हा उद्योग केंद्राचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ४) | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | - सदस्य सचिव |
| ५) | अधिक्षक अनुरक्षणगृह किंवा बालगृहांचे अधिक्षक | - सह सदस्य सचिव |

ज्या जिल्हयांमध्ये अनुरक्षणगृहे नाहीत त्या ठिकाणी आयुक्त, महिला व बाल विकास यांनी निर्देशित केलेल्या बालगृहांचे अधिक्षक, समिती सह सदस्य म्हणून काम पाहतील.

सदर समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहिल.

१. जिल्हयातील सर्व संस्थांमधील प्रवेशीतांचा दर तीमाही आढावा घ्यावा व त्याचा अहवाल आयुक्तांना पाठवावा.

२. संस्थेतील वास्तव्याचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांच्या पुर्नवसनाच्या दृष्टीने नोकरी धंदा व्यवसायाच्या संधी त्यांनी कशा प्राप्त करुन घेता येतील याकरीता लाभार्थींना मार्गदर्शन करणे.

C:\Desk J pawar.doc

३. प्रवेशितांकरीता व्यवसाय मार्गदर्शन सुविधा उपलब्ध करुन देणे.

४. ज्या प्रवेशितांनी व्यवसाय शिक्षण घेतलेले आहे त्यांना स्वयंरोजगाराच्या उपलब्ध संधींची माहिती देणे.

५. व्यवसाय सुरु करण्यासाठी तांत्रिक सल्ला देणे उदा. प्रकल्प अहवाल तयार करणे, अन्य शासकीय योजनांची माहिती देणे.

६. वित्तीय संस्थांकडून कर्ज / अर्थसहाय्य मिळणेसाठी प्रयत्न / मदत करणे.

७. पुर्नवसन झालेल्या प्रवेशितांचा वेळोवेळी आढावा घेऊन त्याचा सविस्तर अहवाल आयुक्त, म.व.बा.वि., पुणे व शासनास पाठवावा.

"महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने."

(कुंदा गोसावी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
महाराष्ट्र औद्योगिक विकास मंडळाचे अधिकारी.
जिल्हा उद्योग केंद्राचे अधिकारी.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परिविक्षा व अनुरक्षण संघटना, पुणे.
अधिक्षक, बालगृह (सर्व).